**नागपूर सुधार प्रन्यास**

**नागपूर सुधार प्रन्यासच्या मौजा बिडीपेठ येथील ख.क्र.९,२४,२५,२६, आर्शिवाद नगर, येथील भूखंड क्र.११३२ क्षेत्र २०५५.६३४ चौ.मी. हा भूखंड तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर यांना हस्तांतरीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**नगरविकास विभाग**

**शासन निर्णय क्र.नासुप्र-२०१८/मुमंस-१६६/प्र.क्र.१०८/नवि-२६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३० नोव्हेंबर, २०१८

वाचा :-

१) कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.संपत्ती विभाग/५४४६ दिनांक ०७/०६/२०१८

२) कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे पत्र क्र.संपत्ती विभाग/१०९६६ दि.२७/०९/२०१८

३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, यांचे पत्र क्र.अ.अ.(मु)/११३४२ दिनांक ०९/१०/२०१८

**प्रस्तावना :**

नागपूर सुधार प्रन्यासच्या मौजा बिडीपेठ येथील ख.क्र. ९,२४,२५,२६, आर्शिवाद नगर, येथील भूखंड क्र.११३२ क्षेत्र २०५५.६३४ चौ.मी. हा भूखंड आणि त्यावरील "टाऊन हॉल" चे बांधकाम तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर या सामाजिक संस्थेस वाटप करण्याबाबत संस्थेने केलेल्या विनंतीस अनुलक्षून, नागपूर सुधार प्रन्यासकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त, नागपूर सुधार प्रन्यासच्या मौजा बिडीपेठ येथील ख.क्र.९,२४,२५,२६, आर्शिवाद नगर, येथील भूखंड क्र.११३२ क्षेत्र २०५५.६३४ चौ.मी. हा भूखंड आणि "जसा आहे तशा स्थितीत" तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर या सामाजिक संस्थेस वाटप करण्यास्तव नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ मधील नियम क्र.२६ अंतर्गत नियम क्रमांक ५ (२) आणि नियम क्र.२० (२) ला शिथीलता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.:-

**शासन निर्णय :-**

सभापती, नागपूर सुधार प्रन्यास यांनी उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ०९/१०/२०१८ च्या पत्रान्वये आणि कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांच्या दिनांक २७/०९/२०१८ अन्वये करण्यात आलेल्या विनंतीनुसार, नागपूर सुधार प्रन्यासच्या मौजा बिडीपेठ, ख.क्र.९, २४, २५, २६ आशीर्वादनगर, येथील भूखंड क्र.११३२ क्षेत्र २०५५.६३४ चौ.मी. "जशा आहे तशा स्थितीत" तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर या सामाजिक संस्थेला खालील अटी-शर्तीच्या अधीन राहून ३० वर्षाकरिता देखभाल/दुरुस्ती आणि व्यवस्थापनाकरिता देण्यास नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ च्या नियम ५ (२) आणि नियम क्र. २०(२) मधील तरतुदीस, नियम २६ अंतर्गत शासनास असलेल्या अधिकारान्वये शिथीलता देऊन, मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. सदर भूखंड व समाज भवनाची मालकी नागपूर सुधार प्रन्यास यांची राहील.
२. सदर समाज भवनाच्या संदर्भात वापर, देखभाल / दुरुस्ती व व्यवस्थापनाच्या कराराचे ३० वर्षानंतर परस्परांच्या सहमतीने दोन्ही पक्ष नुतनीकरण करु शकतील.
३. सदर समाज भवनाच्या वापरातून तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर या संस्थेस प्राप्त होणा-या उत्पन्नाच्या विनियोगाबाबत नागपूर सुधार प्रन्यासने निर्णय घ्यावा आणि या अनुषंगाने

नागपूर सुधार प्रन्यास आणि संबंधित संस्था यांच्यामध्ये होणा-या करारानुसार आकारणीबाबत निर्णय घेण्यात यावा.

४. या समाजभवनाच्या बांधकामापोटी नागपूर सुधार प्रन्यासने केलेला खर्च तिरळे कुणबी सेवा मंडळाने, नागपूर सुधार प्रन्यासला करार करण्यापूर्वी अदा करावा.

५. उत्पन्नाच्या हिश्श्याबाबत नागपूर सुधार प्रन्यास व तिरळे कुणबी सेवा मंडळ, नागपूर यांनी परस्पर सामंजस्याने नोंदणीकृत करार करावा.

६. उपरोक्त भूखंड / व्यवहाराबाबत भविष्यात काही न्यायालयीन वाद उद्भवल्यास, त्याबाबत शासन जबाबदार राहणार नाही.

७. उपरोक्त भूखंडाच्या अनुषंगाने शासनाचा देय महसूल संबंधित वापर करणा-या संस्थेने वेळोवेळी अदा करावा.

८. या समाज भवनाच्या नामकरणाबाबत नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांच्या प्रचलित नियमानुसार उचित निर्णय घेण्यात यावा.

९. समाज भवन सर्वसामान्य जनतेस ना-नफा-ना-तोटा या तत्वावर खुले ठेवण्याची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील.

१०.समाज भवनाचे काम खासदार, स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमांच्या निधीतून झाल्यास, सदर योजनेतील तत्वे, अटी व शर्ती यांचे पालन करण्याची जबाबदारी नागपूर सुधार प्रन्यासची राहील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८११३०१२४१५२४०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yoge Shashikant Narhari

Digitally signed by Yoge Shashikant Narhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=88b7261ec236df5e51055c4e56e97c2ea6823e6595d110ff293acdf173898c9d, cn=Yoge Shashikant Narhari
Date: 2018.12.01 11:59:35 +05'30'

**(शशिकांत योगे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
४) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
५) जिल्हाधिकारी नागपूर, नागपूर
६) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.